“हुतात्मा शिवराम हरी राजगुरु जन्मस्थळ परिसर विकास आराखडा” निधी वितरणाबाबत. सन २०२३-२४

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-निधीवि-२०२४/प्र.क्र.०५/का.१४४४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २८ मार्च, २०२४

**वाचा :** १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवि २०२३/प्र.क्र.९७/का.१४४४-अ, दि.३०.११.२०२३.
२) नियोजन विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. तिक्षेवि २०२३/प्र.क्र.९७/का.१४४४-अ, दि.१०.०१.२०२४.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०४.०३.२०२४.
४) नियोजन विभाग शासन निर्णय क्र. तिक्षेवि २०२३/प्र.क्र.३४/का.१४४४- अ, दि.१२.०३.२०२४.

**प्रस्तावना :**

शासन निर्णय नियोजन विभाग दिनांक ३०/११/२०२३ तसेच दिनांक १०/०१/२०२४ अन्वये रुपये १०२.४८ कोटी किंमतीच्या “हुतात्मा शिवराम हरी राजगुरु जन्मस्थळ परिसर विकास आराखड्यास” मंजूरी देण्यात आली आहे. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात माहे डिसेंबर २०२३ च्या अधिवेशनातील पुरवणी मागणीद्वारे तीर्थक्षेत्र विकास आराखडा योजनेच्या अंतर्गत विविध तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांस उपलब्ध झालेल्या निधीमधून या आराखडयाकरिता जिल्हाधिकारी, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

“हुतात्मा शिवराम हरी राजगुरु जन्मस्थळ परिसर विकास आराखड्यांतर्गत” भूसंपादनाची कार्यवाही करण्यासाठी जिल्हाधिकारी, पुणे यांना सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता “मुख्य लेखाशिर्ष ५४५२ ०२११ - ५३ मोठी बांधकामे” अंतर्गत रु.११,७९,४३,३९७/- (रुपये अकरा कोटी एकोणऐंशी लाख त्रेचाळीस हजार तीनशे सत्त्याण्णव फक्त ) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

२. "हुतात्मा शिवराम हरी राजगुरु जन्मस्थळ परिसर विकास आराखड्यांतर्गत" मंजूर कामांवर होणारा खर्च, "मागणी क्रमांक ओ-१०. ५४५२, पर्यटनावरील भांडवली खर्च, ०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१, पर्यटन केंद्र (००) (००)(१५) तीर्थक्षेत्र व पर्यटनस्थळ विकास आराखडा (५४५२ ०२११)-५३ मोठी बांधकामे (कार्यक्रम) (दत्तमत) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर प्रयोजनासाठी वर नमूद केलेल्या लेखाशिर्षातर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व प्रधान महालेखापाल, मुंबई यांचे कार्यालयाने नोंदविलेला खर्च याचा ताळमेळ घालण्यात यावा. तसेच वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, पुणे यांनी शासनास तात्काळ सादर करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.२५५/२०२४/व्यय-८, दि.२१/०३/२०२४, अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२८१८०४२३५०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2024.03.28 18:14:51 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी,**

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे.

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५. कार्यासन १४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. कार्यासन (व्यय-८, अर्थ -१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती, नियोजन विभाग, का.१४४४-अ, मंत्रालय, मुंबई.